# राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र

क्रमांक-रानिआ-१०९८/प्र. क्र. १९२/९८/पंरा,
नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,
मादाम कामा रोड, मुंबई ४०० ०३२.
दिनांक १६ फेब्रुवारी १९९८.

## परिपत्रक

७३ वी घटना दुरुस्ती (पंचायती राज सुधारणा) १९९२ अन्वये भारताच्या संविधानामध्ये " पंचायत राज " " भाग ९ " समाविष्ट करण्यात आला आहे. त्यामधील अनुच्छेद २४३ एम खंड (४) (ब) नुसार संविधानातील " भाग ९ " अंमर्गत तरतूदी संसदेने केलेल्या कायद्यान्वये (जरूर ते फेरफार अथवा अपवाद त्यात स्पष्ट नमुद करून) घटनेच्या अनुच्छेद २४४ खंड (१) मध्ये दर्शविलेल्या अनुसूचित क्षेत्रास लागू करता येतील.

२. संविधानाचे अनुच्छेद २४४ खंड (१) मधील संदर्भानुसार संविधानाच्या अनुसूचि पांचमधील भाग (सी), परिच्छेद ६ अन्वये मा. राष्ट्रपती यांनी निर्देशित केलेली क्षेत्रे ही अनूसूचित क्षेत्रे राहतील अशी तरतूद आहे.

३. भारताच्या राष्ट्रपतींनी अधिसूचना क्रमांक जीएसआर-८७६ ई, दिनांक २ डिसेंबर १९८५ अन्वये महाराष्ट्रातील ठाणे, नाशिक, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे, नांदेड, अमरावती, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांतील त्यात निर्देशित केलेली क्षेत्रे ही राज्यातील अनुसूचित क्षेत्रे आहेत. वरीलप्रमाणे अनुसूचित क्षेत्रे ज्या अधिसूचनेद्वारा घोषित केली आहेत ती अधिसूचना महाराष्ट्र शासनाने आदिवासी विकास विभागाचे संदर्भ क्रमांक टीएसपी-१०८६/८७१०/प्र. क्र. ३१/का. ५, दिनांक ८ सप्टेंबर १९८७ अन्वये महाराष्ट्र शासनाचे राजपत्राचे भाग ४-क, दिनांक १२ नोव्हेंबर १९८७ मध्ये (पृ. क्र. ७०२ ते ७१६) वर पुनःप्रसिद्ध केली आहे. (प्रत सोबत जोडली आहे).

४. संसदेने पंचायत राज तरतूदी (अनुसूचित क्षेत्रासाठी विस्तारित) अधिनियम, १९९६ (१९९६ चा अधिनियम क्र. ४०) दिनांक २४डिसेंबर १९९६ रोजी पारीत केला. संसदेने पारित केलेल्या सदर अधिनियमानुसार आवश्यक असलेल्या सुधारणा (मुंबई ग्रामपंचायत सुधारणा अधिनियम १९९७ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ४०) मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ मध्ये करण्यात आल्या आहेत. या सुधारीत तरतूदीनुसार राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतीच्या निवडणूका घेण्यात येतात.

५. राज्य निवडणूक आयोगास असे आढळून आले आहे की, ग्रामपंचायतीच्या निवडणूकीचे कामकाज करणारे अधिकारी/कर्मचारी हे उपरोक्त संविधानातील अनुच्छेद २४४ चे खंड (१) नुसार संविधानाच्या पाचव्या अनुसूचितील परिच्छेद ६ चा उपपरिच्छेद (२) च्या प्रदत्त शक्तीनुसार ' आदेश क्र. जीएसआर-८७६, दिनांक २ डिसेंबर १९८५ अन्वये राष्ट्रपतीद्वारा अधिसूचित केलेल्या क्षेत्रासाठी पंचायत राज तरतूदी (अनुसूचित क्षेत्रासाठी विस्तारीत) अधिनियम, १९९६ (१९९६ चा अधिनियम क्र. ४०) (प्रत सोबत जोडली आहे). लागू असताना देखील **त्या क्षेत्राबाहेरील** महाराष्ट्र शासनाने मंजूर केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रामधील ग्रामपंचायतींना पंचायत राज तरतूदी (अनुसूचित क्षेत्रासाठी विस्तारीत) अधिनियम, १९९६ कायदा लागू करून ग्रामपंचायतीच्या निवडणूका घेतात. अशी कार्यवाही करणे हे सर्वस्वी असंविधानात्मक व पूर्णपणे बेकायदेशीर आहे, ह्याची गंभीर दखल सर्व संबंधितांनी घ्यावी.

६. राज्य निवडणूक आयोग आता असे आदेश देत आहे की, अनुसूचित क्षेत्रात पडत असलेल्या ग्रामपंचायतीच्या निवडणूका ह्या पंचायत राज तरतूदी (अनुसूचित क्षेत्रासाठी विस्तारीत) अधिनियम, १९९६ व मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अधिनियम, १९९७ (१९९७ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ४०) व त्याखाली केलेल्या नियमांतील तरतूदीनुसारच घेणे आवश्यक आहे. १९९७ च्या महाराष्ट्र अधिनियम क्र. ४० ची महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध झालेली प्रत संबंधित अकरा जिल्हाधिकारी यांना यापूर्वीच क्र. रानिआ-१०९७/प्र. क्र. १२९/पंरा, दिनांक १८ ऑगष्ट १९९७ च्या पत्रान्वये पाठविण्यात आलेली आहे.

७. **<u>अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींच्या संदर्भात असे स्पष्ट करण्यात येत आहे की,</u>** ज्या ग्रामपंचायती दिनांक २४ डिसेंबर १९९६ रोजी (म्हणजे ज्या दिवशी १९९६ चा संसद अधिनियम ४० हा अंमलात आला त्या दिवशी) अस्तित्यात होत्या, त्या ग्रामपंचायती विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहाने ठराव पारीत करून विघटीत करण्याचे ठरेवले **<u>तरच</u>** त्या विघटीत होवू शकतील. अन्यथा अशा ग्रामपंचायती त्यांचा संपूर्ण पांच वर्षाचा कालावधी पूर्ण करतील.

राज्य निवडणूक आयुक्त यांच्या आदेशानुसार,

**अपर्णा जोशी,**
अवर सचिव,
राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र.

**प्रत :** सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
वैयक्तिक नस्ती (३ प्रती)
निवड नस्ती.